**अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) म.रा.मुंबई यांच्या कार्यालयातील पोलीस अधीक्षक यांना 'प्रादेशिक कार्यालय प्रमुख' म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. एमआयस-१०१८/प्र.क्र.७१/अर्थ-१**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०५ नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ:**-१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक अेपीओ-३६१७/प्र.क्र.११७/पोल-३,दि.१० मे,२०१८
२) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआयस-१०१८/प्र.क्र.७१/ अर्थ-१, दि.२० ऑक्टोबर,२०१८
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे दि.३१.१०.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधिन क्र.१ येथील दि.१० मे, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) हे पद आणि कार्यालय निर्माण करण्यात आले आहे. या नवनिर्मित कार्यालयाचे कार्यक्षेत्र मुंबई पोलीस आयुक्तालय वगळता संपूर्ण राज्य असेल. ही बाब विचारात घेऊन संदर्भ क्र.२ येथील दि.२० ऑक्टोबर, २०१८ शासन निर्णयान्वये अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे.

संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांनी केलेल्या विनंत नुसार पोलीस अधीक्षक यांना **'प्रादेशिक कार्यालय प्रमुख'** व पोलीस उप अधीक्षक यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग एक मधील अ.क्र.२ नियम क्र.२ अन्वये प्रशासनिक विभागास प्रमुखास असलेल्या पुर्ण अधिकारानुसार अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) म.रा.मुंबई यांच्या कार्यालयातील पोलीस अधीक्षक यांना **'प्रादेशिक कार्यालय प्रमुख'** घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०१८११०५१७३०२३७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil J Sovitkar

Digitally signed by Sunil J Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb8ad070bfe5fedb8636c8af019b6d5b7aee194a64475e6d9cb854a5f398ccfa, serialNumber=a1caa5c3fca3d18d9c61102c13b0f35f753257759705f84374415fa099af3556, cn=Sunil J Sovitkar
Date: 2018.11.06 12:31:47 +05'30'

**( सुनिल ज.सोवितकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन) महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. सर्व पोलीस आयुक्त.
५. सर्व पोलीस अधिक्षक (जिल्हे व लोहमार्ग)
६. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल.
७. महालेखापाल ½ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवारी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,गृह विभाग, मंत्रालय.
१२. वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती / गृह विभाग (अर्थ-१).